वित्त विभागासाठी लागणाऱ्या वस्तूंची खरेदी करण्यासाठी मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) खरेदी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : साखमं१०१७/प्र.क्र.६२/प्रशासन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ जून, २०१७

**वाचा:** १. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भागIII/उद्योग-४,दिनांक ०१/१२/२०१६
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : साखमं१०१७/प्र.क्र.६२/प्रशासन-५, दिनांक ३१/०५/२०१७

**प्रस्तावना:**

राज्य शासनाने संदर्भाधीन दिनांक ०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये "शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका" निर्गमित केलेली आहे. सदर नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २.९.३ मध्ये मंत्रालयीन प्रशासकीय विभागासाठी (खुद्द) खरेदी समितीची रचना दिलेली आहे. सदर बाब विचारात घेऊन वित्त विभागामार्फत विभागासाठी लागणाऱ्या वस्तू खरेदी करण्याकरीता मंत्रालयीन प्रशासकीय विभागासाठी (खुद्द) खरेदी समिती शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३१/०५/२०१७ रोजी गठीत करण्यात आली होती. परंतु वित्त विभागातील अन्य कार्यासनांकडूनही खरेदी होत असल्याने दिनांक ३१/०५/२०१७ चा शासन निर्णय रद्द करण्यात येऊन संबंधित सह/उप सचिव यांच्या अध्यक्षेतखाली सुधारित खरेदी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

वाचावे क्रमांक २ येथील समक्रमांकाचा दिनांक ३१/०५/२०१७ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे व पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

राज्य शासनाच्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारित नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २.९.३ मधील तरतूदीनुसार वित्त विभागासाठी (खुद्द) खालीलप्रमाणे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) खरेदी समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | संबंधित कार्यासनाचे सह/उपसचिव | अध्यक्ष |
| २. | उद्योग संचालनालयाचे प्रतिनिधी | निमंत्रित |
| ३. | लेखा व कोषागारे संचालनालयाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | संबंधित कार्यासनाचे अवर सचिव | सदस्य सचिव |

सदर समितीने संदर्भाधीन दिनांक ०१/१२/२०१६ च्या नियमपुस्तिकेतील तरतुदीनुसार सर्व प्रक्रीया पूर्ण करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७०११२२०१५०८०५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra L Ambilpure

Digitally signed by Surendra L Ambilpure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d72bc3a62ca80a6ce5d7700b4fdbe6d0ab222bee157f5f99572baa77b2945a2, cn=Surendra L Ambilpure
Date: 2017.07.01 12:16:47 +05'30'

( सु. लो. अंबिलपूरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (निमंत्रित सदस्य)
३. संचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (सदस्य)
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. सर्व सह/उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती, प्रशासन-५.